व्यसनमुक्ती धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी राज्यात कार्यरत व्यसनमुक्ती केंद्रांना अर्थसहाय्य, महात्मा गांधी व्यसनमुक्ती सल्ला, उपचार व पुनर्वसन योजना सुधारीत नियमावली प्रसिध्द करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक डीडीपी-२०१७/प्र.क्र.७२ /सामासु**

**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**

**दिनांक :- १० मार्च , २०१७.**

वाचा : १) शासन निर्णय क्र. डीडीपी-२००९/प्र.क्र.१४९/सुधार-१, दिनांक १७/०८/२०११

२) शासन निर्णय क्र. डीडीपी-२०१२/प्र.क्र.५७७/सामासु, दिनांक २९/०३/२०१३

३) शासन शुध्दीपत्रक क्र. डीडीपी-२०१२/प्र.क्र.५७७/सामासु, दिनांक ३०/०३/२०१३

४) शासन शुध्दीपत्रक क्र. डीडीपी-२०१२/प्र.क्र.५७७/सामासु, दिनांक ०२/०५/२०१३

५) शासन शुध्दीपत्रक क्र. डीडीपी-२०१२/प्र.क्र.५७७/सामासु, दिनांक ०६/०९/२०१३

**प्रस्तावना :-**

भारताच्या राज्यघटनंतील अनुच्छेद क्र.४७ मध्ये सार्वजनिक आरोग्य व जनतेच्या रक्षणासाठी (औषधीय प्रयोजना व्यतिरिक्त) मादक पदार्थांवरील बंदीचे मार्गदर्शक तत्व समाविष्ट केले आहे. देशात व्यसनाचा वाढता प्रभावामुळे राज्याचा आणि राष्ट्राचा युवा शक्तीचा -हास होत असल्यामुळे यासाठी व्यसनाचे सुपूर्ण निर्मूलन करणे शक्य झाले नाही तरी व्यसनाला आळा घालणे हे राज्याचे सामाजिक दायित्व लक्षात घेवून दिनांक १७/०८/२०११ अन्वये राज्याचे व्यसनमुक्ती धोरण जाहीर करण्यात आले आहे. या धोरणाची प्रभावीपणे अंमलबजावणी होणे आवश्यक आहे. यासाठी व्यसनाधीन व्यक्तींना व्यसनमुक्तीसाठी समुपदेशन करणे, व्यसनामुळे आजारी पडलेल्या रुग्णांवर उपचार करणे, दारुसह सर्व व्यसनांचे दुष्परिणाम व्यसनाधीन व्यक्तिंना समजावून सांगणे व व्यसनमुक्तीचा प्रचार, प्रसार करणे आवश्यक आहे. हे कार्य व्यसनमुक्ती सल्ला, उपचार व पुनर्वसन केंद्रे व प्रचार व प्रसार करणा-या संस्था अत्यंत प्रभावीपणे करु शकतात. व्यसनमुक्ती केंद्रांचे व संस्थांचे या कार्यातील महत्व लक्षात घेता अशा व्यसनमुक्ती केंद्रांना व संस्थांना, ते सध्या करीत असलेले कार्य अधिक जोमाने व प्रभावीपणे करण्यासाठी प्रोत्साहनपर आर्थिक सहाय्य करणे, यासाठी राज्यात सन २०१३-१४ या वर्षापासून, प्रायोगिक तत्वावर व्यसनमुक्ती केंद्रे व संस्थांना अर्थसहाय्य करणारी "**महात्मा गांधी व्यसनमुक्ती सल्ला, उपचार, पुनर्वसन, प्रचार व प्रसार योजना**" सुरु केली आहे.

तथापी, अशा व्यसनमूक्ती केंद्रांच्या कामकाजाचे मुल्यमापन व्हावे, तसेच प्रभावी व सकारात्मक काम करणाऱ्या अशासकीय संस्थांची निवड पारदर्शकपणे व्हावी, व योग्य संस्थांना आर्थिक मदत योग्य पध्दतीने उपलब्ध करुन देण्यासाठी प्रचलित कार्यपध्दती व नियमावली यामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

व्यसनमुक्ती धोरणाची प्रभावी अंमलबजावणी करणे तसेच व्यसनाधीन व्यक्तींचे /रुग्णांचे पुनर्वसन करणे या कार्यातील व्यसनमुक्ती केंद्रांचे व संस्थांचे महत्व लक्षात घेता या क्षेत्रात कार्यरत असलेल्या व्यसनमुक्ती केंद्राचे आर्थिक मजबुतीकरण करणे यासाठी व्यसनमुक्ती केंद्राना अर्थसहाय्य करणारी महात्मा गांधी व्यसनमुक्ती सल्ला,उपचार व पुनर्वसन केंद्र या योजनेस शासन मान्यता देत आहे.

२. सदर योजनेनुसार व्यसनमुक्तीसंबंधी काम करणा-या संस्था व केंद्रे यांना दरवर्षी प्रत्येक महसुली विभागात प्रत्येकी दोन संस्था या प्रमाणे एकूण १२ केंद्रे/संस्थांना प्रत्येकी रु. ११,००,०००/- (अक्षरी रुपये अकरा लाख फक्त) याप्रमाणे रु. १,३२,००,०००/- (अक्षरी रु. एक कोटी बत्तीस लाख फक्त) एवढया रक्कमेचे प्रोत्साहनात्मक अनुदाना शासन मान्यता देत आहे.

**<u>सदर योजनेची कार्यपध्दती :</u>**

१) व्यसनमुक्ती केंद्रे व संस्थांना प्रदान करावयाच्या अनुदानासाठी आयुक्त, समाज कल्याण, पुणे हे राज्यातील सर्व वृत्तपत्रांमध्ये जाहीरात देऊन अर्ज मागवतील अथवा जाहिरातीचा मसुदा अंतिम करुन जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधीत) यांचेकडून जाहिरात प्रसिध्द करुन अर्ज मागवतील. **<u>(परिशिष्ट-१ व २)</u>**

२) इच्छुक केंद्रे व संस्थांनी ही जाहिरात प्रसिध्द झाल्यानंतर दिलेल्या मुदतीत अर्ज सादर करावेत.

३) पात्र व्यसनमुक्ती केंद्रे व संस्थांची निवड ही प्राप्त अर्जामधून विहित निकषाप्रमाणे करण्यात येईल. निवडीचे निकष **<u>परिशिष्ट-३</u>** प्रमाणे राहतील.

४) संबंधित जिल्हयातील जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद हे व्यसनमुक्ती केंद्र/संस्थांची तपासणी करुन स्वयंस्पष्ट अभिप्राय नोंदवून प्रस्ताव सर्व कागदपत्रांसह आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे सादर करतील. **<u>(परिशिष्ट-४)</u>**

५) प्रस्तावांच्या छाननीची कार्यवाही, आयुक्त, समाज कल्याण यांच्यास्तरावर करण्यात येईल.

६) निकषांची पूर्तता करणा-या व्यसनमुक्ती केंद्रे व संस्थांमधून अनुदानासाठी व्यसनमुक्ती केंद्रांची व संस्थांची अंतिम निवड मा. मंत्री, सामाजजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या राज्यस्तर निवड समितीव्दारे करण्यात येईल.

७) **<u>निवड समितीची रचना खालील प्रमाणे राहील.</u>**

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | : | अध्यक्ष |
| (२) | राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | : | उपाध्यक्ष |
| (३) | सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | : | सदस्य |
| (४) | आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे | : | सदस्य |
| (५) | उप सचिव, सामाजिक न्याय | : | सदस्य सचिव |

निवड समितीचा निर्णय अंतिम राहील.

८) निवड केलेल्या व्यसनमुक्ती केंद्रे व संस्थांची, जिल्हा समाज कल्याण अधिकारी,जिल्हा परिषद हे त्रैमासिक भेट देवून तपासणी करतील व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण हे वर्षातून दोनदा सदर व्यसनमुक्ती केंद्रे/संस्थांना भेट देवून तपासणी करतील व अहवाल आयुक्तालयास सादर करतील.

९) निवड केलेले व्यसनमुक्ती केंद्रे व संस्थांना प्रथम हप्त्याची ५०% रक्कम अनुदान प्राप्त झाल्यानंतर तात्काळ देण्यात येईल. दुसऱ्या हप्त्यासाठी स्वयंसेवी संस्थांनी संपूर्ण वर्षात केलेले काम, हाती घेतलेले उपक्रम इत्यादी बाबींचा अहवाल सर्व कागदपत्रांसह, जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांचेकडे सादर करावा, सदरचा अहवाल जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सदरचा अहवाल अभिप्रायासह प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग यांना सादर करावा. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग यांनी सर्व बाबींची तपासणी करुन संस्थेने केलेल्या खर्चाचे व शिल्लक अनुदानाच्या मर्यादेत मुल्यांकन करुन उर्वरीत अनुदान माहे फेब्रुवारी व मार्च मध्ये वितरीत करावे**. (अर्थसहाय्याच्या बाबी परिशिष्ट-५)**

१०) सदरहू योजनेबाबतचा खर्च सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या, मागणी क्र. एन-३, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाज कल्याण-१०५, दारुबंदी , (०२) स्वयंसेवी संघटनांना सहाय्य, (०२) (०१) व्सयनाधिन व्यक्तींसाठी अंमली पदार्थ सेवन विरोधी मोहीम चालविणे, त्यांच्यावर उपचार करणे, व्यसनाधीन व्यक्तींचे पुनर्वसन करणे याकरिता स्वयंसेवी संघटनांना वित्तीय सहाय्य, (२२३५-१७५५) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या अर्थसंकल्पिय तरतुदीमधून भागविण्यात येईल.

११) या प्रयोजनासाठी संबंधीत जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१५११५२३८७२२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशाने व नावाने.

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2017.03.15 11:53:59 +05'30'

**(ज्ञा.ल.सुळ)**

उप सचिव ,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२) मा. मंत्री, (सा.न्या.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३) मा. राज्यमंत्री, (सा.न्या.), यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परीक्षा), महाराष्ट्र ½, मुंबई/नागपूर

५) सर्व विभागीय आयुक्त

६) सर्व पोलीस आयुक्त,

७) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मंत्रालय, मुंबई

८) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे

९) सर्व जिल्हाधिकारी
१०) सर्व पोलीस अधिक्षक, महाराष्ट्र राज्य
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) निवासी लेखा परिक्षक, मुंबई
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१४) अवर सचिव (व्यय-१५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) अवर सचिव (अर्थसंकल्प) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, मंत्रालय,मुंबई
१६) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग
१७) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१८) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१९) निवड नस्ती, का-सामासु

**शासन निर्णय क्रमांक डीडीपी-२०१७/प्र.क्र. ७२ /सामासु , दिनांक :- १० मार्च, २०१७.**

**परिशिष्ट -१**

**अर्ज मागविण्याची कार्यपध्दती व वेळापत्रक**

| अ.क्र. | विषय | कालावधी |
| --- | --- | --- |
| १. | आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे वृत्तपत्रांमध्ये जाहिरात देऊन अर्ज मागवतील. | ३० एप्रिल पर्यंत |
| २. | जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, अर्ज प्राप्त करुन घेतील. | २५ मे पर्यंत |
| ३. | जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद प्राप्त अर्जांची छाननी करुन आयुक्तालयाकडे सादर करतील. | ३१ मे पर्यंत |
| ४. | आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे त्यांचे स्तरावरील तपासणी समितीकडून प्राप्त अर्जांची छाननी करुन राज्यस्तरीय छाननी समितीकडे सादर करतील. | ३० जून पर्यंत |
| ५. | मा.मंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे अध्यक्षतेखाली गठीत राज्यस्तरीय निवड समितीव्दारे पात्र संस्थांची निवड करण्यात येईल. | ३० जुलै पर्यंत |

**शासन निर्णय क्रमांक डीडीपी-२०१६/प्र.क्र.७२ /सामासु , दिनांक :- १० मार्च , २०१७.**

**परिशिष्ट -२**

**अर्जाचा नमुना**

**महात्मा गांधी व्यसनमूक्ती सल्ला, उपचार, पुनवर्सन केंद्र, प्रचार व प्रसार योजनेंतर्गत स्वयंसेवी संस्थांना प्रोत्साहनात्मक अनुदानासाठी करावयाचा अर्ज.**

| | | |
|---|---|---|
| १. | संस्थेचे नांव | |
| | पुर्ण पत्ता व दुरध्वनी क्रमांक | |
| २. | संस्था स्थापनेचे वर्ष | |
| ३. | संस्थेचा नोंदणी क्रमांक व दिनांक : | |
| | अ) संस्था नोंदणी अधिनियम, १९५० | |
| | ब) सार्वजनिक विस्वस्त अधिनियम, १८६० | |
| ४. | व्यसनमूक्ती सल्ला, उपचार व पुनवर्सन केंद्राचा संपूर्ण पत्ता. | |
| | अनुदानित / विनाअनुदानित | |
| ५. | संस्थेच्या घटनेमध्ये व्यसनमूक्ती कार्याबाबतचा उल्लेख आहे काय? | |
| ६. | संस्थेच्या पदाधिकाऱ्यांचे / कार्यकारिणी नांवे व पत्ता. (घटनेची प्रत जोडावी.) | |
| ७. | कार्यकारिणीची निवडणूक केव्हा झाली. | |
| ८. | मागील पाच वर्षाचा, सनदी लेखापालाचा लेखा अहवाल. | |
| ९. | यापूर्वी, राज्य शासनाकडून संस्थेस व्यसनमूक्ती केंद्रासाठी मिळालेले अनुदान वर्षेनिहाय | |
| १०. | मागील पाच वर्षांमध्ये घेण्यात आलेल्या उपक्रमांचा वर्षनिहाय अहवाल. | |
| ११. | संस्थेच्या बँक खात्याबाबतचा तपशिल : | |
| | संस्थेच्या बँकेचे नांव व पत्ता | |
| | बँकेचा खाते क्रमांक | |
| | बँकेच्या खात्यात शिल्लक असलेली रक्कम (प्रारुप छायाप्रत) | |
| | संस्थेचा पॅनकार्ड क्रमांक | |

| | | |
|---|---|---|
| १२. | इमारतीबाबतची माहिती | |
| | अ) इमारत संस्थेच्या मालकीची / भाड्याची | |
| | ब) इमारत जेथे आहे, तेथील पत्ता. | |
| | क) इमारतीचे जागेचे क्षेत्रफळ | |
| | ड) प्रकल्पासाठी वापरत असलेल्या खोल्यांची संख्या | |
| | इ) पाणी पुरवठा, विजेची सोय, शौचालय, स्वच्छतागृहे, स्नानगृहे यांची संख्या | |
| | ई) खाटांची / बेड ची संख्या | |
| | उ) इमारत भाड्याची असल्यास इमारत मालकाचे संमतीपत्र.(नोटराईज) | |
| १३. | व्यसनमूक्ती केंद्रास लागणारे आवश्यक फर्निचर / जडसंग्रह आहे काय? (तपशिल द्यावा.) | |
| १४. | योजनेचा लाभ घेतलेल्या लाभार्थींची संख्या (मागील ३ वर्षाची वर्षनिहाय) (प्रवेशित लाभार्थ्यांची वर्षनिहाय यादी व प्रवेशनोंदवहीचा उतारा जोडावा.) | |
| १५. | केंद्र शासनाने संस्थेच्या व्यसनमूक्ती केंद्रास मंजूरी दिली आहे काय? | |
| | केंद्राचे मंजूरी वर्षे | |
| | असल्यास, किती खाटांची / बेडची | |
| | आतापर्यंत केंद्र शासनाकडून प्राप्त अनुदानाचा वर्षनिहाय तपशिल. | |
| १६. | संस्थेने व्यसनमूक्ती व्यतिरिक्त इतर प्रकल्प राबविले आहेत काय?<br>असल्यास कोणते? | |
| १७. | किती लाभार्थी व्यसनापासून मूक्त झालेले आहेत. (मागील ३ वर्षाची वर्षनिहाय) | |
| १८. | व्यसनमूक्ती केंद्रातील कर्मचारी संख्या (पदनिहाय तपशिल द्यावा.) | |
| १९. | कर्मचारी प्रशिक्षीत आहे काय? | |
| २०. | वर्षनिहाय कार्यक्रमांची यादी व छायाचित्रणे | |

| | | |
|---|---|---|
| २१. | संस्थेचे मागील वर्षी व्यसनमूक्ती क्षेत्रातील विशेष मौलिक कामकाज. | |
| २२. | संस्थेने व्यसनमूक्तीवर आधारीत राबविलेल्या कार्यक्रमांची कात्रणे, छायाचित्रासह. | |
| २३. | अ) संस्थेविरुध्द, तसेच संस्थेच्या पदाधिकाऱ्यां विरुध्द कोणत्याही प्रकारचा गुन्हा दाखल झालेला आहे काय?<br>असल्यास, त्याबाबतची संपूर्ण माहिती. | |
| | ब) संस्था चालवित असलेल्या शासकीय उपक्रमांबाबत संस्थेविरुध्द शिस्तभंगाची कारवाई झालेली आहे काय?<br>असल्यास, त्याबाबतची संपूर्ण माहिती. | |
| २४. | विहीत नमुन्यातील बंधपत्र (रु.१००/- चे स्टँप पेपर वरील) जोडले आहे काय? | |

संस्थेच्या अध्यक्ष/सचिव
सही व शिक्का

शासन निर्णय क्रमांक डीडीपी-२०१७ /प्र.क्र. ७२ /सामासु , दिनांक :- १० मार्च , २०१७ .

## परिशिष्ट -३

**व्यसनमुक्ती केंद्रास व संस्थांना द्यावयाच्या अनुदानासाठी निकष.**

१. व्यसनमुक्ती सल्ला, पुनर्वसन, प्रचार व प्रसार यासाठी केंद्रे व संस्थांना योजनेसाठी विहित नमुना अर्ज असेल.

२. संस्था नोंदणी अधिनियम १९५० व सार्व. विश्वस्त अधिनियम १८६० अंतर्गत नोंदणीचे प्रमाणपत्र जोडणे आवश्यक.

३. संस्था पाच वर्षापासून संबंधित क्षेत्रामध्ये कार्यरत असणे आवश्यक राहिल.

४. संस्थेचा मागील पाच वर्षाचा सनदी लेखापालाचा लेखा अहवाल जोडणे आवश्यक आहे.

५. जडसंग्रह यादी, औषधांची यादी, मागील ३ वर्षातील लाभार्थ्यांची यादी व केलेल्या कार्याचा अहवाल जोडणे आवश्यक

६. इमारत भाडे, करारनामा, संस्थेचे कार्यालय इ. बाबतच माहिती जोडण्यात यावी.

७. इमारतीचा/जागेचा नकाशा जोडावा.

८. मागील तीन वर्षांचे वार्षिक अहवाल जोडण्यात यावेत.

९. संस्थेने राबविलेल्या विशेष कार्यक्रमांची कात्रणे, छायाचित्रे इ. जोडावीत.

१०.व्यसनमुक्ती केंद्रातील कर्मचा-यांबाबतचे निकष :

| अ.क्र. | पदनाम | शैक्षणिक पात्रता | अनुभव | पदांची संख्या | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | १५ खाटांच्या केंद्रासाठी | ५० खाटांच्या केंद्रासाठी |
| १ | वैद्यकीय अधिकारी (मानसोपचार तज्ञ) | एम.बी.बी.एस. डी.पी.एम. | ३ वर्ष | १ | २ |
| २ | प्रकल्प अधिकारी | एम.एस.डब्लू | २ वर्ष | १ | १ |
| ३ | समुपदेशक | एम.एस.डब्लू/एम.ए. (सायकॉलॉजी) | २ वर्ष | ३ | ७ |
| ४ | परिचारिका | ए.एन.एम./जी.एन.एम. | २ वर्ष | २ | ३ |
| ५ | पहारेकरी | एस.एस.सी. | | १ | १ |

११. प्रस्तावास संबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांनी शिफारस केलेली असावी.

शासन निर्णय क्रमांक डीडीपी-२०१७ /प्र.क्र. ७२ /सामासु , दिनांक :- १० मार्च, २०१७.

## <u>परिशिष्ट -४</u>

(स्वयंसेवी/सेवाभागी संस्थांमार्फत चालविल्या जाणा-या राज्याचे व्यसमनुक्ती केंद्रे व संस्थांचा तपासणी अहवाल/अनुदान शिफारशीबाबतचा विहित नमुना)

| अ.क्र. | तपासणीबाबत तपशिल | अभिप्राय |
|---|---|---|
| १ | तपासणी अधिका-याचे नांव, पद, कार्यालय | |
| | तपासणी अधिका-या दूरध्वनी क्रमांक | |
| | संस्थेचा/केंद्राचा भेटीचा दिनांक व वेळ | |
| २ | संस्थेचे संपूर्ण नांव व पत्ता दूरध्वनीसह | |
| ३ | संस्था नोंदणीकृत आहे का? नोंदणी क्रमांक व दिनांक | |
| ४ | संस्थेचे सध्या कार्यरत असलेले कार्यकारी मंडळ व घटनेची सत्यप्रत प्रमाणित करुन जोडण्यात यावी. | |
| ५ | संस्थेस केंद्र शासनाकडून वर्षनिहाय प्राप्त झालेल्या अनुदानाचा तपशिल | |
| ६ | संस्थेने गेल्या ५ वर्षात केलेल्या व्यसनमुक्ती कार्याचा वार्षिक अहवाल (यामध्ये संस्थेने उत्कृष्ट प्रचार, शिबीरे व व्यसनमुक्त झालेल्या व्यक्तींचा यादी इ.) तपशिल | |
| ७ | संस्थेने गेल्या ५ वर्षाचा लेखा परिक्षण अहवाल (लेखा परिक्षण अधिका-यांनी पारित केलेला) त्याची सत्यप्रत सोबत जोडावी. | |
| ८ | संस्थेकडे नियमानुसार केंद्र चालविण्यासाठी जागा पुरेशी आहे का? जागेची इमारत व्यवस्थित आहे का? (जागेचा तपशिल.) | |
| ९ | संस्थेकडे योजनेच्या अटी व शर्तीनुसार शैक्षणिक पात्रता असलेले कर्मचारी आहेत का? असल्यास, त्यांचे नांव, पदनाम, शैक्षणिक पात्रता, रुजू दिनांक, मानधन व योग्यता प्रमाणपत्र यादी सोबत जोडावी. | |

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>तपासणीबाबत तपशिल</th><th>अभिप्राय</th></tr>
<tr><td>१०</td><td>कर्मचा-यांनी व्यसनमुक्ती केंद्रामध्ये कामांसंर्भात विशिष्ठ प्रशिक्षण घेतले आहे काय? असल्यास प्रशिक्षणाचा कालावधी व प्रशिक्षण घेतल्याचे ठिकाण नमुद करावे.</td><td></td></tr>
<tr><td>११</td><td>व्यसनमुक्ती केंद्रास किती खाटांची परवानगी आहे. सध्या किती खाटा उपलब्ध आहेत.</td><td></td></tr>
<tr><td>१२</td><td>समुपदेशन कोणत्या प्रकारचे देण्यात येते. (वैयक्तीक/गट/कौटुंबिक)</td><td></td></tr>
<tr><td>१३</td><td>वर्षनिहाय केंद्रामध्ये प्रवेशित व उपचार घेतलेल्या लाभार्थ्यांची संख्या (आंतररुग्ण)</td><td>
<table>
<tr><td></td><td colspan="2">प्रवेशित लाभार्थी संख्या</td><td colspan="2">पूर्ण बरे झालेले लाभार्थी संख्या</td></tr>
<tr><td></td><td>पुरुष</td><td>स्त्री</td><td>पुरुष</td><td>स्त्री</td></tr>
<tr><td>२०१३-१४</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>२०१४-१५</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>२०१५-१६</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>एकुण</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>१४</td><td>वर्षनिहाय केंद्रामध्ये उपचार घेतलेल्या लाभार्थ्यांची संख्या (बाह्यरुग्ण)</td><td>
<table>
<tr><td>वर्ष</td><td colspan="2">लाभार्थी संख्या</td><td colspan="2">पूर्ण बरे झालेले लाभार्थी संख्या</td></tr>
<tr><td></td><td>पुरुष</td><td>स्त्री</td><td>पुरुष</td><td>स्त्री</td></tr>
<tr><td>२०१३-१४</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>२०१४-१५</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>२०१५-१६</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>एकुण</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
</table>
</td></tr>
</table>

<table>
<tr><th>अ.क्र.</th><th>तपासणीबाबत तपशिल</th><th>अभिप्राय</th></tr>
<tr><td>१५</td><td>वर्षनिहाय प्रवेशित लाभार्थ्यांचा रुग्णालयातील उपचाराचा कालावधी</td><td>
<table>
<tr><th>वर्ष</th><th>३० दिवस</th><th>३१ ते ६० दिवस</th><th>६० दिवसांपेक्षा जास्त</th><th>३० दिवसांपेक्षा कमी किंवा ६० दिवसां पेक्षा जास्त उपचारांच्या कालावधीचे कारण</th></tr>
<tr><td>२०१३-१४</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>२०१४-१५</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>२०१५-१६</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
<tr><td>एकुण</td><td></td><td></td><td></td><td></td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>१६</td><td>पूर्ण बरे झालेल्या लाभार्थ्यांचे कोणत्या प्रकारे पुनर्वसन करण्यात येते. पुनर्वसित झालेल्या लाभार्थ्यांची संख्या.</td><td></td></tr>
<tr><td>१७</td><td>लाभार्थ्यांना इतर सोयी सुविधा देण्यात येतात का? असल्यास कोणत्या.</td><td></td></tr>
<tr><td>१८</td><td>लाभार्थ्यांकडून शुल्क आकारण्यात येते का? असल्यास कोणत्या सेवेसाठी व किती त्याचा तपशिल द्यावा.</td><td></td></tr>
<tr><td>१९</td><td>संस्थेने अनुदान प्राप्तीसाठी विहित मार्गाने प्रस्ताव सादर केला आहे का?</td><td></td></tr>
<tr><td>२०</td><td>तपासणीच्या वेळी कोणते कर्मचारी उपस्थित होते, नाव व पदनामासह यादी.</td><td></td></tr>
<tr><td>२१</td><td>भेटीच्या वेळी किती लाभार्थी उपस्थित होते.</td><td></td></tr>
<tr><td>२२</td><td>संस्था अनुदानाचा उपयोग विहित पध्दतीने, नियम व अटीनुसार केला जातो का?</td><td></td></tr>
<tr><td>२३</td><td>संस्थेने व्यसनमुक्ती केंद्राचे लोकाभिमुख करण्यासाठी केलेले</td><td></td></tr>
</table>

| अ.क्र. | तपासणीबाबत तपशिल | अभिप्राय |
|---|---|---|
| | विशेष कार्य व राबविलेले उपक्रम तपशिल. | |
| २४ | कोणत्या वर्षासाठी अनुदान हवे व किती हे स्वयंस्पष्ट नमुद करावे. | |
| २५ | प्रथम दिलेले अनुदान व केव्हा मिळाले त्याचा तपशिल द्यावा. | |
| २६ | तपासणी अधिका-याचा स्वयंस्पष्ट अहवाल | |
| २७ | स्पष्ट शिफारस आहे/नाही. | |

## प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, मी (संपूर्ण नांव ) श्री./श्रीमती ------------------------------ जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,-------------- दिनांक ----------- रोजी ------वा. व्यसनमुक्ती केंद्रास भेट दिली. वरील प्रपत्रात जी माहिती सादर केली आहे, ती योग्य व बरोबर असून संस्थेचे काम सुव्यवस्थित व समाधानकार आहे. सदर संस्थेस सन --------------- या आर्थिक वर्षासाठी अनुदान मिळणेबाबत स्पष्ट शिफारस करीत आहे.

जिल्हा समाज कल्याण अधिकारी,

जिल्हा परिषद,--------.

शासन निर्णय क्रमांक डीडीपी-२०१७ /प्र.क्र. ७२ /सामासु , दिनांक :- १० मार्च, २०१७.

## <u>परिशिष्ट -५</u>

अर्थसहाय्य खर्च करावयाच्या बाबींचा तपशिल :-

| **अ.क्र.** | **बाबी** | **तपशिल** |
|---|---|---|
| १ | कार्यालयीन खर्च | स्टेशनरी, |
| २ | मानधन | प्रकल्प अधिकारी, मानसोपचार तज्ञ, वैद्यकीय उपचार तज्ञ, स्त्री/पुरुष परिचारिका, सहाय्यक सल्लागार, पहारेकरी, |
| २ | व्यसनाधीन लोकांवर उपचार, सल्ला व पुनर्वसन | औषधोपचार |
| ३ | प्रचार व प्रसिध्दी | • सभोवतालच्या परिसरात व्यसनमुक्ती प्रचार व प्रसार,<br>• जिल्ह्यातील शैक्षणिक संस्थांमध्ये व्यसनांच्या दुष्परिणामांची माहिती द्यावी.<br>• महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना दवाखान्यात नेहून व्यसनांच्या दुष्परिणामांची माहिती द्यावी.<br>• जिल्हयात तसेच गावागावात व्यसनमुक्ती अभियान राबवावे, किर्तने व लोककला माध्यमातून गावागावातून दारुबंदी व व्यसनमुक्तीचा प्रचार करावा.<br>• अंमली पदार्थ विरोधी दिन, तंबाखू विरोधी दिन, धूम्रपान विरोधी दिन व नशाबंदी दिवस असे दिवस साजरे करण्याबाबत शैक्षणिक संस्थांमधून व जिल्हयातून प्रचार फेऱ्या काढाव्यात. |

**शासन निर्णय क्रमांक डीडीपी-२०१७/प्र.क्र. ७२ /सामासु , दिनांक :- १० मार्च, २०१७.**

## परिशिष्ट -६

## मुल्यांकन अहवाल

| अ.क्र. | बाब | एकूण गुण | प्राप्त गुण |
|---|---|---|---|
| १. | संस्थेचे ध्येय व उद्दिष्टे काय आहेत? | ०५ | |
| २. | व्यसनमूक्ती केंद्रात अस्तित्वात असलेल्या खाटांची संख्या | १० | |
| ३. | व्यसनमूक्ती केंद्रामध्ये शौचालय, पाणी, विज पुरवठा यांची सुविधा, | १० | |
| ४. | व्यसनमूक्ती केंद्रामध्ये उपलब्ध प्रशिक्षीत मनुष्यबळ | १० | |
| ५. | समाजसेवा क्षेत्रात संस्थेस प्राप्त पुरस्कार | १० | |
| ६. | व्यसनमुक्ती कार्यक्रमा व्यतिरिक्त राबविलेले लोकाभिमुख इतर कार्यक्रम. | १५ | |
| ७. | व्यसनमूक्ती केंद्रात दाखल होऊन व्यसनमूक्त झालेल्या लाभर्थ्यांची संख्या. | १५ | |
| ८. | मागील तीन वर्षाचे सनदी लेखापाल यांचा अहवाल. | ०५ | |
| ९. | संस्थेने मागील वर्षी व्यसनमूक्तीसाठी केलेले विशेष मौलिक कामकाज. | १० | |
| १०. | व्यसनमूक्ती केंद्र / संस्थेमार्फत लाभार्थ्यांना पुरविण्यात येणाऱ्या इतर सुविधा | १० | |
| | एकूण गुण | १०० | |

टिप :

संस्थेविरुध्द, तसेच संस्थेच्या पदाधिकाऱ्या विरुध्द गुन्हा दाखल झाला असल्यास किंवा शासनाने शिस्तभंगाची कारवाई केली असल्यास, अशा संस्थांना या योजनेकरीता अपात्र ठरविण्यात येईल.

❖ संबंधीत जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अभिप्राय :--------------------
-----------------------------------------------------------------------------
-----------------------------------------------------------------------------
-----------------------------------------------------------------------------

जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
जिल्हा परिषद---------------